**उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखालील उपजिल्हा / ग्रामिण रुग्णालयातील दंतशल्य चिकित्सकांची व सहायक यांची अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पदआ -२०१९ /प्र.क्र.१९८/आरोग्य-३

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
दिनांक : १९ ऑक्टोंबर, २०१९

<u>वाचा -</u>

**१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक -पदआ २०१९/प्र.क्र. १९८/आरोग्य -३, दिनांक- १७.०६.२०१९.**

**२) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-८अ/अस्थाई पदे/१०२९-३६/१०३९-४२/१०४७-१०४८,दिनांक-११.०६.२०१९ व १३.०६.२०१९**

## शासन निर्णय-

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये १) उपजिल्हा रुग्णालय, रामटेक जि.नागपूर २) ग्रामीण रुग्णालय,कोरपना जि.चंद्रपूर ३) उपजिल्हा रुग्णालय, कामठी जि.नागपूर ४) ग्रामीण रुग्णालय, कारंजा जि.वर्धा ५) ग्रामीण रुग्णालय, उमरेड जि.नागपूर ६) उपजिल्हा रुग्णालय, आर्वी जि. वर्धा ७) ग्रामीण रुग्णालय, भद्रावती जि.चंद्रपूर येथील प्रत्येकी १ दंत शल्य चिकित्सक व १ सहायक याप्रमाणे १४ अस्थायी पदास दि.३०.०९.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखालील १) उपजिल्हा रुग्णालय, रामटेक जि.नागपूर २) ग्रामीण रुग्णालय,कोरपना जि.चंद्रपूर ३) उपजिल्हा रुग्णालय, कामठी जि.नागपूर ४) ग्रामीण रुग्णालय, कारंजा जि.वर्धा ५) ग्रामीण रुग्णालय, उमरेड जि.नागपूर ६) उपजिल्हा रुग्णालय, आर्वी जि. वर्धा ७) ग्रामीण रुग्णालय,

भद्रावती जि.चंद्रपूर येथील प्रत्येकी १ दंत शल्य चिकित्सक व १ सहायक अश्या एकूण १४ अस्थायी पदास दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१९-२०२० या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-आर-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६ - सार्वजनिक आरोग्य
००१ - संचालन व प्रशासन,
००१ (०८) - प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामिण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (२२१० ०४१३)

मागणी क्रमांक-आर-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०३ - ग्रामिण आरोग्य सेवा व विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
११० - १ इतर रुग्णालये व दवाखाने
(०१)(०१) - कुटीर रुग्णालये (२२१० ०३१५)

मागणी क्रमांक-आर-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६ - सार्वजनिक आरोग्य
००१ - संचालक व प्रशासन
००१(०९) - महाराष्ट्र आरोग्यसेवा विकास प्रकल्पाअंतर्गत ग्रामिण कुटीर रुग्णालयाचे उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन (२२१० ४६२४)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्रमांक,पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दिनांक-११.०९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१८१२१४३७२५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2019.10.19 12:19:46 +05'30'

(रो.दि.कदम पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये - राज्यस्तर) मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, नागपूर /वर्धा/ चंद्रपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर /वर्धा/ चंद्रपूर.
८. संबंधित वैद्यकीय अधिक्षक,उपजिल्हा/ग्रामिण रुग्णालय,जि.नागपूर /वर्धा/ चंद्रपूर.
९. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०.कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती (आरोग्य-३)